महात्मा फुले कृषि विद्यापीठ ,राहुरी अंतर्गत मौजे काष्टी, ता.मालेगाव, जि.नाशिक येथे शासकीय अन्नतंत्रज्ञान महाविद्यालय सुरु करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन ,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :मफुकृवि-१४२०/प्र.क्र.६४/७-अे,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : १८ नोव्हेंबर, २०२१.

संदर्भ : १) या विभागाचा शासन निर्णय क्रमांक : मफुकृवि-१४२०/प्र.क्र.६४/७-अे, दि.२१.०९.२०२०.

२) महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे क्रमांक : मकृप/शिक्षण-१/ प्र.क्र.२२०/२१३४/२०२१, दि.२५.१०.२०२१.

प्रस्तावना -:

महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मौजे काष्टी, ता.मालेगाव जि.नाशिक येथे कृषि विज्ञान संकुल निर्मितीस व या संकुलात कृषि महाविद्यालय, उद्यानविद्या महाविद्यालय, अन्नतंत्रज्ञान महाविद्यालय, कृषि व्यवसाय व्यवस्थापन महाविद्यालय आणि कृषि अभियांत्रिकी व तंत्रज्ञान महाविद्यालय ही पाच महाविद्यालये सुरु करण्यास दि.२६.०८.२०२० रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीतील निर्णयानुसार तत्वत: मान्यता दिली आहे.

२. महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मौजे काष्टी, ता. मालेगांव, जि. नाशिक येथे कृषि विज्ञान संकुल निर्मिती अंतर्गत शासकीय महाविद्यालये स्थापन करण्याबाबत दि.१८.६.२०२० रोजी संपन्न् झालेल्या विद्यापीठाच्या विद्या परिषदेमध्ये आणि दि.२२.६.२०२० रोजी संपन्न् झालेल्या कार्यकारी परिषदेमध्ये मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. तसेच कृषि परिषदेच्या १०३ व्या बैठकीमध्ये पारित ठराव क्र. ०२/१०३/२०२० अन्वये, प्रस्तावित पाच महाविद्यालयांपैकी सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षापासून नवीन शासकीय अन्नतंत्रज्ञान महाविद्यालय सुरु करण्यास तसेच त्यासाठी भारतीय कृषि अनुसंधान परिषदेच्या प्रस्तावित निकषानुसार आवश्यक पदांना आणि एकूण खर्चास मान्यता प्रदान करुन शासनाकडे शिफारस केली आहे.

३. मौजे काष्टी, ता. मालेगांव, जि. नाशिक येथे कृषि विज्ञान संकुल स्थापन करण्याकरीता महाराष्ट्र राज्य शेती महामंडळ, पुणे यांच्या मालकीची मौजे काष्टी येथील ब्लॉक नं.३ व ४ मधील अंदाजे २५० हे. इतकी जमीन महात्मा फुले कृषि विद्यापीठ ,राहुरी , जि.अहमदनगर यांना कब्जेहक्काने हस्तांतरीत करण्यास महसूल व वन विभागाच्या शासन निर्णय क्र.मशेम-२०२०/प्र.क्र.२५/ल-७, दि.२६.१०.२०२० अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार सदर जमीन ताब्यात घेण्यात आली आहे .पाचव्या अधिष्ठाता समितीच्या शिफारशींनुसार अन्नतंत्रज्ञान महाविद्यालयासाठी आवश्यक जमिन उपलब्ध आहे.

४. राज्यमंत्रीमंडळाच्या दि.२६.०८.२०२० च्या बैठकीतील निर्णयानुसार संदर्भ क्र.१ येथील या विभागाच्या दि.२१.०९.२०२० च्या शासन निर्णयान्वये फेज-१ मध्ये कृषि व्यवसाय व्यवस्थापन महाविद्यालय व फेज-२ मध्ये अन्नतंत्रज्ञान महाविद्यालय सुरु करण्यास मान्यता देण्यात आली असून कृषि व्यवसाय व्यवस्थापन महाविद्यालय सुरु करण्यात आले आहे. आता फेज-२ मधील अन्न तंत्रज्ञान महाविद्यालय सुरु करण्याबाबत संदर्भ क्र.२ येथील महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांच्याकडून प्रस्ताव प्राप्त झाला असून त्यानुसार कार्यवाही करण्याची बाब शासनाच्या विचाधीन होती.

**शासन निर्णय** :-

महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी अंतर्गत मौजे काष्टी, ता.मालेगाव, जि.नाशिक येथे सन २०२१-२२ पासून प्रतिवर्ष ४० विद्यार्थी प्रवेशक्षमतेचे शासकीय अन्नतंत्रज्ञान महाविद्यालय सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर महाविद्यालयासाठी भारतीय कृषि अनुसंधान परिषदेच्या ५ व्या अधिष्ठाता समितीने निश्चित केल्याप्रमाणे आवश्यक असलेल्या पदांना उच्चस्तर सचिव समितीची रितसर मान्यता घेऊन पदनिर्मितीचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३ तसेच सदर महाविद्यालय स्थापन करण्यासाठी पुढील पाच वर्षाकरिता टप्प्या-टप्प्याने येणाऱ्या आवर्ती आणि अनावर्ती खर्चाबाबतचेही आदेश निर्गमित करण्यात येतील.

४. सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षापासून या महाविद्यालयात प्रवेशप्रक्रिया राबविण्यात यावी.

५. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३६४/१४३१, दि.०८.११.२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११११८१५११५३८७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Balasaheb Kisan Raskar

Digitally signed by Balasaheb Kisan Raskar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aaa93f4d4e49359ddfdb4a9eb4176d16d9032454ac5c700ad6e2a7ad0b3115db, pseudonym=5EAA59C86FCC105FE11B11B0E29C44034464028D, serialNumber=2CF78D68CEEAC33CA63C8A2F2B360EBF1C6AC77C6A1AD4C5BFB24951806AF0A8, cn=Balasaheb Kisan Raskar
Date: 2021.11.18 15:16:35 +05'30'

**( बा. कि. रासकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.मंत्री (नियोजन व वित्त), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.मंत्री (कृषि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.राज्यमंत्री (कृषि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
८. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक / विद्यापीठ अभियंता, महात्मा फुले कृषि विद्यापीठ , राहुरी,
९. जिल्हाधिकारी, अहमदनगर,
१०. उप विभागीय कृषि अधिकारी, नाशिक,
११. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
१२. जिल्हा कोषागार अधिकारी/उप कोषागार अधिकारी, नाशिक,
१३. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१४. उप लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१७. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई,
१८. नियोजन विभाग (कार्यासन -१४३१), मंत्रालय, मुंबई,
१९. कक्ष अधिकारी (कार्यासन-६-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. कार्यासन (७-अे) निवडनस्ती.